वैध मापन शास्त्र यंत्रणेच्या फेररचनेनंतर बाधित उप नियंत्रक यांच्या पदस्थापना तसेच सन २०२३ मधील नियतकालीक बदलीबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन आदेश क्रमांक - वैमाशा - २०२३ / प्र.क्र.६३/ग्रासं-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक - २६ मे, २०२३

**शासन आदेश :-**

शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग दि. १४ ऑक्टोंबर, २०२२ अन्वये वैध मापन शास्त्र यंत्रणेतील मंजूर पदांचे क्षेत्रीय स्तरावर फेरवाटप करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयान्वये जुन्या रचनेतील काही पदे कमी झाल्यामुळे सदर पदावर कार्यरत असणा-या अधिका-यांची पदस्थापना तसेच महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (१),४ (३) व ४ (२) मधील तरतूदीनूसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने वैध मापन शास्त्र यंत्रणेतील खालील उप नियंत्रक गट-ब (राजपत्रित) यांची बदली त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र. ४ मधील कार्यालयातील निरीक्षक पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिका-यांचे नाव | सध्याचे कार्यरत पद | पदस्थापना / बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. र. मो. चौधरी | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जि. क्र ४, मुंबई महानगर विभाग | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्र.३ |
| २ | श्री. सि. सा. कदम | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, ठाणे जिल्हा | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पालघर जिल्हा |
| ३ | श्री. रा. फ. राठोड | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, रायगड जिल्हा | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, ठाणे जिल्हा क्र.१ |
| ४ | श्री. एस. एन. कवरे | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे जिल्हा | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, रायगड जिल्हा क्र.१ |
| ५ | श्री. ए. एस. गिरनारे | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक जिल्हा | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक (शहर) जिल्हा क्र.१ |
| ६ | श्री. वि. पी. पवार | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुख्यालय मुंबई | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, ठाणे जिल्हा क्र.२ |
| ७ | श्री. नि. रा. कांबळे | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, बुलढाणा जिल्हा | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, छत्रपती संभाजीनगर विभागीय कार्यालय. |
| ८ | श्री. अ. रा. मानवतकर | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्रं- ३ | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्र.२ |
| ९ | श्री. डी. जी. महाजन | उप नियंत्रक, (प्रतिनियुक्ती) मैत्री कक्ष, उद्योग विभाग | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, पुणे जिल्हा क्र.३ |
| १० | श्री. प्र. र. परदेशी | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, परभणी जिल्हा | उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, नाशिक (ग्रामीण) जिल्हा क्र.२ |

२. संबंधीत उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी बदलीचे ठिकाणी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता हेच कार्यमुक्तीचे आदेश समजून तात्काळ रुजू व्हावे व आपला रुजू अहवाल नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना तसेच शासनास cp3.mhpds@gov.in या ई-मेल वर त्वरीत पाठवावा.

३. सदर आदेश निर्गमित केल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने ) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच बदली झालेल्या अधिकारी / कर्मचा-याने बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. यास्तव उपरोक्त उप नियंत्रक यांनी नविन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल. व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेचा खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही. याची जाणीव संबंधीतांना करुन देण्यात येत आहे.

४. संबंधित अधिका-यांना नवीन पदस्थापनेच्या पदावर रुजू होणेसाठी पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता तसेच इतर अनुषंगिक भत्ते अनुज्ञेय असतील.

५. नियंत्रक, वैधमापन शास्त्र यांना कळविण्यात येते की, संबंधीत उप नियंत्रक यांनी पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहित कालवधीत संबंधीत अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजु न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरीत अवगत करावे, जेणेकरुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरीत करणे शक्य होईल. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियंम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली / पदस्थापना झालेल्या अधिका-यांचे रेजेचे अर्ज स्वीकारु नयेत / मंजुर करु नयेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०५२६११२०५५५२०६ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE91C22A99ADBAFEB91E1127B17CEF54D9C48672DC90AC9562BA7F619961CBBB, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2023.05.26 12:03:58 +05'30'

**( सतिश सुपे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व संबंधित उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र.

**प्रत -:**

१) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आवश्यक त्याकार्यवाहीकरीत

२) मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,

३) सचिव, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक

४) विकास आयुक्त, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (मैत्री कक्ष), मंत्रालय, मुंबई.

५) सर्व सहनियंत्रक, वैधमापन शास्त्र,

६) सचिव, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक

७) महालेखापाल -१ ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.